**श्री शैलम आंध्रप्रदेश येथील छत्रपती शिवाजी महाराज स्मारक परिसरात “ध्यानमंदिर”उभारण्यासाठी श्री शिवाजी मेमोरिअल कमिटीस सहायक अनुदान देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-४२१६/प्र.क्र.३५२/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १४ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-४२१६ /प्र.क्र.३५२/२९, दिनांक ०३.०३.२०१७.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-४२१६ /प्र.क्र.३५२/२९, दिनांक २३.०३.२०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राचे स्फुर्तीस्थान जाणता राजा छत्रपती शिवाजी महाराज यांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या महाराष्ट्र राज्याबाहेरील भूमीवर उभारावयाच्या स्मारकासाठी शासनाचा आर्थिक व भावनिक सहभाग म्हणून रू.५.०० कोटी निधी राखून ठेवण्याची घोषणा सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये मा. मंत्री, वित्त महोदयांनी केली होती. त्यास अनुसरून श्री शिवाजी मेमोरिअल कमिटी, श्री शैलम, आंध्र प्रदेश यांना छत्रपती शिवाजी महाराज स्मारक परिसरामध्ये छत्रपती शिवाजी महाराज “ध्यानमंदीर” उभारण्यास रु. ३३८.७३ लाख इतके सहायक अनुदान देण्याची विनंती श्री शिवाजी मेमोरिअल कमिटी यांनी केली आहे. प्रस्तुत सहायक अनुदान रु.३३८.७३ लाख देण्यास मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुसार सदर कमिटीस शासन निर्णय क्रमांक बीयुडी-४२१६ /प्र.क्र.३५२/२९, दिनांक ०३.०३.२०१७ अन्वये रु.१ कोटी व बीयुडी-४२१६/प्र.क्र.३५२/२९, दिनांक २३.०३.२०१८ अन्वये रु.१ कोटी असे एकूण रु.२ कोटी इतके सहायक अनुदान वितरीत करण्यात आले आहे. वित्तीय वर्ष २०१८-१९ करीता सदर बाबीसाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला रु.७१.६२ लाख व हिवाळी अधिवेशन-२०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेला रु.६७.११ लाख अशी एकूण तरतूद रुपये १,३८,७३,०००/- (रुपये एक कोटी अडतीस लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतके सहायक अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत आता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

श्री शिवाजी मेमोरिअल कमिटी**,** श्री शैलम, यांना श्रीशैलम (आंध्रप्रदेश ) येथील छत्रपती शिवाजी महाराज स्मारक परिसरामध्ये छत्रपती शिवाजी महाराज “ध्यानमंदीर” उभारण्यास रु.३३८.७३ लाख इतके सहायक अनुदान देण्यास मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुसार वर नमूद करण्यात आलेल्या संदर्भान्वये आतापर्यंत रुपये २ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता वित्तीय वर्ष २०१८-१९ करीता सदर बाबीसाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला रु.७१.६२ लाख व हिवाळी अधिवेशन-२०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेला रु.६७.११ लाख अशी एकूण तरतूद रुपये १,३८,७३,०००/- (रुपये एक कोटी अडतीस लाख त्र्याहत्तर हजार फक्त) **इतके सहायक अनुदान निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच संबंधित न्यासाचे लेखापरिक्षण अहवाल ( निधी वितरीत करण्यात आलेल्या वित्तीय वर्षाचे) निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसाच्या आत शासनास सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

२. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२६ ,मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी श्री शिवाजी मेमोरिअल कमिटीस वितरीत करावा. सदर कमिटीच्या बँक खात्याचा माहिती/तपशिल पुढील प्रमाणे आहे.

संस्थेचे नाव : SHREE SHIVAJI MEMORIAL COMMITTEE.
संस्थेचा पत्ता: A/P. SRISAILAM, DIST.KURNOOL. SRISAILAM-518101 (Andhra Pradesh)
बँकेचे नाव: आंध्रा बँक (ANDHRA BANK)
बँकेचा पत्ता: TEMPLE COMPLEX SRISAILAM- 518101.(A.P.)

खाते क्रमांक: 051510100001361
खाते प्रकार : SAVING ACCOUNT.
बँक शाखेचा संकेतांक : 000515.
एम.आर.सी.आर .क्र. : 518011523.
आय.एफ.एस.सी.क्र. : ANDB0000515.

आहरण व संवितरण अधिकारी यांनी, महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी.

३. या कामावर होणारा खर्च मागणी क्रमांक ए-४, लेखाशीर्ष २०७५, -संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० इतर खर्च, (००) (०१) भारतीय लोक प्रशासन संस्था व इतर संस्थांना सहायक अनुदान (संकेतांक २०७५ ००६२ ) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५५/२०१९/व्यय-४, दिनांक २८.१.२०१९ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१४१६४८४८८२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400027, st=Maharashtra, 2.5.4.20=20283e5186ccca8f0350182971072649a1b738829e2db98425839104e8e271f1, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2019.02.22 15:50:25 +05'30'

( म.कि.वाव्हळ )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१.मा.राज्यपाल यांचे सचिव
२.मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
३.मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
४. प्रधान सचिव (प्र.सु.,र.व का.),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५.सचिव (बांधकामे),सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
६.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
७. महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
९.महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (दोन प्रती),सामान्य प्रशासन विभाग, (कार्या-२६ मार्फत)
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२.वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४ ), मंत्रालय, मुंबई
१३.सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२५ ), मंत्रालय, मुंबई
१४.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४४३),मंत्रालय,मुंबई
१५. श्री. शिवाजी मेमोरिअल कमिटी, श्रीशैलम, जि. कुर्नुल, श्रीशैलम, आंध्र प्रदेश-५१५ १०१

**यांना कळविण्यात येते की, वरील निधी प्राप्त होताच १५ दिवसांच्या आत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच संबंधित न्यासाचे लेखापरिक्षण अहवाल सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.**

१६.निवड नस्ती ( कार्यासन-२९) सा.प्र.विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.